**सर्वसाधारण बदली-२०२५**
**तहसिलदार संवर्ग**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र.बदली-२०२५/प्र.क्र.८४/ई-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३० मे, २०२५

**संदर्भ**:- १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ३(१) व ४(१) मधील तरतुदींनुसार खाली नमूद केलेल्या तहसिलदार संवर्गातील अधिकाऱ्यांना प्रशासकीय कारणास्तव त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याची पदस्थापना | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | श्रीमती ऐश्वर्या आनंद गिरी | तहसिलदार कारंजा(घा), जि.वर्धा | **तहसिलदार लाखांदूर, जि.भंडारा या श्री.वैभव पवार यांच्या प्रस्तावित बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर** |
| २. | श्री.वैभव दौलतराव पवार | तहसिलदार लाखांदूर, जि.भंडारा | **तहसिलदार धानोरा, जि.गडचिरोली या रिक्त पदावर** |
| ३. | श्री.नरसय्या मुत्यालू कोंडागुर्ले | तहसिलदार सालेकसा, जि.गोंदिया | **तहसिलदार तुमसर, जि.भंडारा या रिक्त पदावर** |
| ४. | श्री.प्रदीप शेवाळे | तहसिलदार धारणी, जि.अमरावती | **तहसिलदार (सामान्य प्रशासन),जि.का.अमरावती (श्री.प्रशांत पडघन यांच्या पदोन्नतीने रिक्त झालेल्या पदावर)** |
| ५. | श्री. निखील शामसुंदर धूळधर | तहसिलदार वणी, जि.यवतमाळ | **कार्यरत पदावर मुदतवाढ** |
| ६. | श्रीमती शितल अंबण्णा बंडगर | तहसिलदार मंगरुळपीर, जि.वाशिम | **तहसिलदार अकोला, जि.अकोला या रिक्त पदावर** |

| क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याची पदस्थापना | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| ७. | श्री. किशोर यादव | तहसिलदार माहूर, जि.नांदेड | **अप्पर तहसिलदार नळदुर्ग, जि.धाराशिव या रिक्त पदावर** |
| ८. | श्री.कैलास पुंडलीक पवार | सहायक जिल्हा पुरवठा अधिकारी, नाशिक | **तहसिलदार बोदवड, जि.जळगांव या रिक्त पदावर** |
| ९. | श्री.आदेश मारुती डफळ | तहसिलदार तथा रचना व कार्यपद्धती अधिकारी, मुंबई शहर (आस्थापना शाखा) | **तहसिलदार मुरूड, जि.रायगड या श्री.रोहन शिंदे यांच्या प्रस्तावित बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर** |
| १०. | श्री. रोहन भिमराव शिंदे | तहसिलदार मुरुड, जि.रायगड | **तहसिलदार मोखाडा, जि.पालघर या श्री.मयुर चव्हाण यांच्या प्रस्तावित बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर** |
| ११. | श्रीमती चारुशिला बाबुराव पवार | तहसिलदार विक्रमगड जि.पालघर | **तहसिलदार (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालय, कोंकण, नवी मुंबई या श्री.विजय व्हटकर यांच्या दि.३०.०६.२०२५ रोजी सेवानिवृत्तीने रिक्त होणाऱ्या पदावर** |
| १२. | श्री.मयुर बबन चव्हाण | तहसिलदार मोखाडा, जि.पालघर | **तहसिलदार तथा रचना व कार्यपद्धती अधिकारी, मुंबई शहर (आस्थापना शाखा) या श्री.आदेश डफळ यांच्या प्रस्तावित बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर** |
| १३. | श्री.विजयकुमार भाऊसाहेब चोबे | तहसिलदार, सक्षम प्राधिकारी क्र. ८, झो.पु.प्रा. बांद्रा, जि.मुंबई उपनगर | **तहसिलदार विक्रमगड, जि.पालघर या श्रीमती चारूशिला पवार यांच्या प्रस्तावित बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर** |

२. सदरील आदेश तात्काळ अंमलात येत असून संबंधित अधिकारी यांनी स्तंभ क्र.४ मधील नमूद पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रुजू व्हावे. संबंधीत अधिकारी त्यांना देण्यात आलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत e3.revenue@maharashtra.gov.in या ईमेलद्वारे / टपालाद्वारे शासनास त्वरीत कळवावे.

३.	महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत संबंधित अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा **अनुपस्थितीचा कालावधी हा "अकार्यदिन"*(dies non)* म्हणून गणला जाईल**, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

४.	संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करू नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

५.	सदरहू आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक ) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लघंन करणारी असल्यामूळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६.	सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२५०५३०२२४१४९२८१९ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT PRALHAD SAPKAL

Digitally signed by PRASHANT PRALHAD SAPKAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=c2ec242caef55e035a22245b60a2752c90753e697f5e56596b3524d34280a891, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=9548CB33E24729A59B6A5C72EE905604BA53420C8EACFD34E9E8C2460B8AA409, cn=PRASHANT PRALHAD SAPKAL
Date: 2025.05.30 22:42:29 +05'30'

**(प्र.प्र.सपकळ)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

सर्व विभागीय आयुक्त

**प्रत,**

- मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (नगरविकास) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
- संबंधित जिल्हाधिकारी.
- प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
- संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
- संबंधित अधिदान व लेखा अधिकारी.
- संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.
- अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- संबंधित तहसिलदार (संबंधित विभागीय आयुक्त यांचेमार्फत).
- सह सचिव (ई-३) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- निवडनस्ती (ई-३).